निलंबन रद्द करुन शासन सेवेत पुन:स्थापित करणेबाबत.

डॉ. महेश एम.कापगते, पशुधन विकास अधिकारी (गट-अ)

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन आदेश क्र.पसंप्र-२०१७/प्र.क्र.८७/पदुम-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक - २८ जून , २०१७

**शासन आदेश :-**

पशुसंवर्धन विभागातील डॉ. महेश एम. कापगते हे पशुधन विकास अधिकारी (गट-अ) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१,शहापूर, ता.जि.भंडारा येथे कार्यरत असताना त्यांच्याविरुध्द लाचेचा सापळा प्रकरणी गु.र.नं.क्र.३०३६/२०१५ लाचलुचपत प्रतिबंधक कायदा १९८८ मधील कलम-७, १३(१)(ड) सह (१३)(२) अन्वये दि. २१.१२.२०१५ रोजी पोलीस स्टेशन, जवाहरनगर, जि.भंडारा येथे गुन्हा नोंदविण्यात येऊन त्यांना अटक करण्यात आली. डॉ.कापगते यांना दि.१६.०२.२०१६ च्या शासन आदेशान्वये अटकेचा दि.२१.१२.२०१५ पासून निलंबित करण्यात आले. डॉ.कापगते यांच्या निलंबनास एक वर्षापेक्षा अधिक कालावधी झाला असून, सदर प्रकरणी त्यांच्याविरुध्द न्यायालयात दि.२.१२.२०१६ च्या आदेशान्वये अभियोग दाखल करण्यात आला आहे व दि.४.५.२०१७ च्या ज्ञापनान्वये विभागीय चौकशी आदेशित करण्यात आली आहे. डॉ. कापगते यांच्या प्रकरणी शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, दि.१४.१०.२०११ मधील ४(ब) येथे नमूद अटी व शर्तींची पूर्तता होत असल्याने निलंबन आढावा समितीने डॉ.कापगते यांचे निलंबन रद्द करुन त्यांना पुन:स्थापित करण्याबाबत शिफारस केली आहे. सबब, डॉ.कापगते यांच्याविरुध्द प्रलंबित न्यायालयीन व विभागीय चौकशी प्रकरणी अंतिम निर्णयाच्या अधिन राहून डॉ. कापगते यांचे निलंबन रद्द करुन त्यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात येत आहे. तसेच पुन:स्थापनेनंतर डॉ. कापगते यांची पदस्थापना खालील तक्त्यातील त्यांच्या नावासमोर स्तंभ ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे पदावर करण्यात येत आहे.

| क्र. | अधिकाऱ्यांचे नांव | निलंबनापूर्वीचे पदस्थापनेचे ठिकाण | पुन:स्थापनेनंतर पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | डॉ. महेश एम. कापगते, पशुधन विकास अधिकारी (गट-अ) | पशुवैद्यकीय दवाखाना, श्रे-१, शहापूर, ता.जि.भंडारा | पवैद श्रेणी-१ हालेवारा, ता.एटापल्ली, जि.गडचिरोली |

२. संबंधित अधिकारी यांनी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. रुजू झाल्यानंतर रुजू अहवाल शासनास तात्काळ सादर करावा.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०६२८१६०७१३३६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vinod Sopanrao Mendhe

Digitally signed by Vinod Sopanrao Mendhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3dfd984bb7c5aede090473e34b1c93fa9f36d97d56c0cf07812a43c5ca5d6a24, cn=Vinod Sopanrao Mendhe
Date: 2017.06.28 16:03:55 +05'30'

**(वि.सो.मेंढे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत ,**

१. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य,औंध,पुणे.
२. प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त,नागपूर
३. सहआयुक्त पशुसंवर्धन (मुख्यालय), पशुसंवर्धन आयुक्तालय, पुणे
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. भंडारा/गडचिरोली
५. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, भंडारा/गडचिरोली
६. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जि.प. भंडारा/गडचिरोली
७. जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा/गडचिरोली
८. संबंधित अधिकारी, (द्वारा - आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य,पुणे)
९. निवड नस्ती.